**सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत- अपंगत्व प्राप्त जवान हवलदार पाटील संभाजी बंडु, जि. कोल्हापूर.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०२२/ प्र. क्र. १०३/२८ (अर्थ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०५/०५/२०२२.

वाचा

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम १०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ०४.१०.२०००.
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०१९/प्रस्ताव/सैकवि-१६/७४३, दि. १३/०४/२०२२.

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन दिनांक ०४.१०.२००० च्या शासन निर्णयानुसार देशातील कोणत्याही क्षेत्रात अंतर्गत सुरक्षा संबंधी मोहिमेत/चकमकीत मे १९९९ पासून अपंगत्व आलेल्या, सैन्य दलातील तसेच सीमा सुरक्षा बल व इतर निमलष्करी दलातील महाराष्ट्र राज्याचे अधिवासी असलेल्या अपंगत्व प्राप्त जवानांना त्यांच्या अपंगत्वाच्या प्रमाणानुसार रु.१.०० लक्ष व रु.३.०० लक्ष इतकी आर्थिक मदत अनुज्ञेय आहे.

**शासन निर्णय:-**

सैनिक कल्याण विभागाने दिनांक १३/०४/२०२१ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार अपंगत्व प्राप्त **हवलदार पाटील संभाजी बंडु** या जवानास आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | नाव व पत्ता | अपंगत्व प्राप्त दिनांक, मोहिम व ठिकाण | रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | नं. १४९२५५१९-एन<br>हवलदार<br>पाटील संभाजी बंडु<br>मु. पो. कल्याणपूर<br>कालकुंद्री, ता. चंदगड,<br>जि. कोल्हापुर,<br>पिन:- ४१६५०८. | दि. १३ जानेवारी, २०१४.<br>महाजन फिल्ड फायरिंग रेंज,<br>राजस्थान येथे कार्यरत असताना<br>ग्रेनेडचा स्फोट झाल्यामुळे त्यांच्या<br>कानाला इजा झाली त्यामुळे अपंगत्व. | **३,००,०००/-** |
| | | **एकूण रूपये** | **३,००,०००/-** |

२. उपरोक्त रु. ३,००,०००/- (रुपये तीन लक्ष फक्त) रक्कमेपैकी ४० % म्हणजे रु. १,२०,०००/- (रुपये एक लाख वीस हजार फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ६० % रक्कम म्हणजे रु. १,८०,०००/- (रुपये एक लाख ऐंशी हजार फक्त) मुख्यमंत्री सहायता ( कारगिल ) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रक्कमेपोटी होणारा खर्च रुपये १,२०,०००/- (रुपये एक लाख वीस हजार फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष " २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२- सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत सुक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त जवानांना आर्थिक मदत (२२३५ २६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, कोल्हापूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन दिनांक ४.१०.२००० मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०६१२०५४२६२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji gulabrao gore

Digitally signed by Shivaji gulabrao gore
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a914ec7d72351a68d9f12e80317d7512bf6f19c34fee2557e3b3c882cce6f57, pseudonym=FBF0A6AA972F003B5B0C7967AD7B6A3C4FA38DC8, serialNumber=0FB38126D364A4D9F8873B7BC48B4369F1657CA258FC9C6479A27B4D539F409B, cn=Shivaji gulabrao gore
Date: 2022.05.06 12:06:25 +05'30'

**( शिवाजी गोरे )**
**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, कोल्हापूर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, कोल्हापूर,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. हवलदार पाटील संभाजी बंडु,मु. पो.कल्याणपूर कालकुंद्री,ता.चंदगड,जि.कोल्हापुर, पिन:- ४१६५०८.
११. निवड नस्ती (२ प्रती).